नागपूर मेट्रो रेल्वे टप्पा-२ प्रकल्पामधील राज्य शासनाचे दुय्यम कर्ज सहाय्य महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन यांना वितरित करण्याबाबत. (सन २०२४-२५)

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमआरडी-३३२४/प्र.क्र.८५/नवि-७**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १९ मार्च, २०२५.

**पहा :-**

१. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एनएमआर-३३१८/प्र.क्र.१४५/नवि-७, दि.१४.०१.२०१९.
२. गृहनिर्माण व शहरी कार्य मंत्रालय, भारत सरकार यांचे K-१४०११/०६/२०१९-MRT, दि.२९.१२.२०२२ रोजीचे पत्र.
३. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. ३३१८/प्र.क्र.१४५/नवि-७, दि.१२.०५.२०२३.
४. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. ३३२३/प्र.क्र.६२/नवि-७, दि.२२.०९.२०२३.
५. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३ दि. १२ एप्रिल, २०२३.
६. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. ३३२३/प्र.क्र.१२३/नवि-७, दि.२६.०३.२०२४
७. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. ३३२४/प्र.क्र.८५/नवि-७, दि.२१.०६.२०२४

**प्रस्तावना:**

नागपूर मेट्रो रेल्वे टप्पा-२ प्रकल्पास नगर विकास विभाग शा.नि.क्र.एनएमआर-३३१८/प्र.क्र.१४५/नवि-७, दिनांक १२ मे, २०२३ च्या शासन निर्णयान्वये शासन मान्यता दिली आहे. सदर प्रकल्पास केंद्रशासनाने पत्र क्रमांक K-१४०११/०६/२०१९-MRT, दिनांक २९ डिसेंबर, २०२३ अन्वये मान्यता दिली आहे. नागपूर मेट्रो रेल्वे टप्पा-२ प्रकल्पातील केंद्र व राज्य शासनाचा सहभाग हा गुंतवणूक/समभाग (Equity) व दुय्यम कर्ज सहाय्य या स्वरुपात रहाणार आहे. सदर प्रकल्पासाठी वित्तीय संस्थांचे कर्ज सहाय्य घ्यावयाचे असून हे कर्ज सहाय्य केंद्र शासनामार्फत घेतले जाणार आहे. अशा प्रकारच्या सर्व निधी हा सदर प्रकल्पाच्या अंमलबजावणी करणाऱ्या महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. या विशेष हेतू वहन कंपनीकडे सुपूर्द करावयाचा आहे. कर्जाची परतफेड या विशेष हेतू वहन कंपनीने करावयाची आहे.

दिनांक २९ सप्टेंबर, २०२३ रोजी केंद्र शासन, राज्य शासन व महामेट्रो यांच्यात सामंजस्य करारनामा करण्यात आला आहे. नागपूर मेट्रो रेल्वे टप्पा-२ प्रकल्पाच्या प्रकल्प पूर्णत्वासाठी लागणारा एकूण रु ६७०८ कोटी निधी मध्ये राज्य शासनाच्या वतीने समभाग म्हणून एकूण रु.९९८.२० कोटी व केंद्रीय कराच्या ५०% रक्कम रु.१९७ कोटी आणि बांधकाम कालावधीतील व्याजाकरिता रु.१५ कोटी असे एकूण रु.२१२ कोटी बिनव्याजी दुय्यम कर्ज सहाय्य म्हणून उपलब्ध करावयाचे आहे. सन २०२४-२५ या वर्षामध्ये दुय्यम कर्ज वितरणासाठी रु.९७ कोटी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. उक्त तरतुदीमधून **रु.६४.६६९९ कोटी** इतकी रक्कम महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि. या कंपनीस

राज्य शासनाकडून बिनव्याजी दुय्यम कर्ज म्हणून वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>** -

१. नागपूर मेट्रो रेल्वे टप्पा-२ प्रकल्प कार्यान्वित करण्यासाठी राज्य शासनाकडून बिनव्याजी दुय्यम कर्ज म्हणून **रु.६४,६६,९९,०००/- (अक्षरी रुपये चौसष्ट कोटी सहासष्ट लाख नव्याण्णव हजार फक्त)** इतकी रक्कम महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि. यांना प्रदान करण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त रक्कम "मागणी क्र. एफ-७ ६२१७- नगर विकासासाठी कर्जे , ८०, सर्वसाधारण १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे राज्य योजना, (००) (०२) नागपूर मेट्रो रेल्वे प्रकल्पाकरिता राज्य शासनाचे दुय्यम कर्ज ५५ - कर्जे व आगाऊ रक्कमा सांकेतांक क्रमांक (६२१७०७८८) या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ मधील मंजूर तरतूदीतून खर्ची घालण्यात यावी. सदर निधी वितरण हे **बिनशर्त** स्वरुपाचे आहे.

३. उपरोक्त लेखाशीर्ष उपयोगात आणण्यासाठी नगर विकास विभागाचे कक्ष अधिकारी, नवि-५, यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच सह सचिव न.वि.-५, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी यांनी प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यास मंजुरी प्राप्त रक्कम **रू.६४.६६९९ कोटी** रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडून आहरीत करून ती महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि. यांच्याकडे वर्ग करावी. याबाबतच्या खर्चमेळाची कार्यवाही नवि-३१ कार्यासनाने करावी.

४. राज्य शासनाकडून दुय्यम कर्ज सहाय्य म्हणून **रु.६४.६६९९ कोटी** रक्कम नागपूर मेट्रो रेल्वे टप्पा-२ प्रकल्पासाठी महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लिमिटेडला केंद्रीय/राज्यस्तरीय कर यावरील खर्चासाठी वितरीत करण्यात येत आहे.

५. राज्यशासनाकडून दुय्यम कर्जसहाय्य म्हणून वितरीत उपरोक्त रक्कम **रु.६४.६६९९ कोटी** महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लिमिटेडकडून सदर प्रकल्पासाठी बाह्य वित्तीय संस्थाकडून घेतलेल्या मुख्य कर्जाची परतफेड केल्यानंतर एका हप्त्यात वसूल करण्यात यावी.

६. भविष्यात सदर दुय्यम कर्जावर व्याज अदा करावयाचे झाल्यास त्याची वसूली महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. यांच्याकडून करण्यात येईल, या अटीवर महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. यांना वितरीत करावयाचे दुय्यम कर्ज **रु.६४.६६९९ कोटी** हे बिनव्याजी कर्ज म्हणून वितरीत करण्यात येत आहे.

७. नागपूर मेट्रो रेल्वे टप्पा-२ या प्रकल्पाकरिता राज्य शासनाकडून केंद्रीय व राज्यस्तरीय करापोटी येणाऱ्या खर्चासाठी प्राप्त झालेली रक्कम महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लिमिटेडकडे जमा झाल्याचे प्रमाणपत्र सादर करण्यात यावे.

८. सदर रक्कम वितरीत झाल्यानंतर या रक्कमेतून खर्च केलेल्या रक्कमांचा तपशील राज्य शासनाला सादर करण्यात यावा.

९. सदर प्रकल्पासाठी केंद्र शासन/राज्य शासन/एमआयडीसी/एमएडीसी इ. कडून तसेच राज्य शासनामार्फत केंद्रीय/करापोटी येणाऱ्या खर्चासाठी प्राप्त होणाऱ्या रक्कमांसाठी महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लिमिटेड यांनी स्वतंत्र लेखे ठेवावेत.

१०. राज्य शासनाकडून वितरीत करण्यात येणाऱ्या सदर कर्ज सहाय्यासाठी राज्य शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या कर्जाविषयीच्या इतर संबंधीत अटी व शर्ती लागू राहतील.

११. नागपूर मेट्रो रेल्वे टप्पा-२ प्रकल्पासाठी प्राप्त होणाऱ्या निधीबाबत राज्य शासनाच्यावतीने व्यवस्थापकीय संचालक, महामेट्रोने स्वतंत्र लेखे ठेवावेत व वितरीत झालेल्या निधीचे संनियंत्रण करावे.

१२. सदर रक्कम ज्या प्रयोजनासाठी मंजूर केली आहे ती त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावी.

१३. सदर कर्ज सहाय्याच्या वितरणाबाबत शादिक-२०१२/प्र.क्र.४९/ऋण व हमी दिनांक ३०/१२/२०१४ मधील सूचनानुसार महाऋण आज्ञावलीत **जोडपत्र-अ** (सोबत जोडले आहे) नुसार माहिती भरण्याची कार्यवाही करण्यात यावी.

१४. राज्य शासनाकडून नागपूर मेट्रो रेल्वे टप्पा-२ प्रकल्पाकरीता वितरीत निधीची परिस्थिती खालील प्रमाणे :-

| अ. क्र. | दिनांक | रक्कम (रु. कोटी) | निधी वितरीत करणाऱ्या संस्थेचे नाव | एकूण वितरीत निधी (रु. कोटी) |
|---|---|---|---|---|
| १ | १३.१०.२०२३ | ४०.०० | राज्य शासन | ४०.०० |
| २ | २५.०१.२०२४ | ३०.०० | राज्य शासन | ७०.०० |
| ३ | २६.०३.२०२४ | ३०.०० | राज्य शासन | १००.०० |
| ४ | २१.०६.२०२४ | ३२.३३०१ | राज्य शासन | १३२.३३०१ |
| ५ | सदरचे वितरण | ६४.६६९९ | राज्य शासन | **१९७.००** |

१५. सदर निधी वितरण आदेश वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३ दि. १ एप्रिल, २०२४ मधील संबंधित सर्व अटींचे तसेच परिपत्रकासोबतच्या परिशिष्ठामधील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची पूर्तता होत आहे.

१६. सदर निधी वितरण आदेश वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१२ फेब्रुवारी, २०२५ अन्वये प्राप्त मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहेत.

१७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३१९१२४३०६८०२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8ba dbee9e69852845f0a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB58BF87424 118BCCD6EE07340581733B70, cn=VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2025.03.19 12:43:53 +05'30'

**[विजय चौधरी]**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.

२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव.
३. मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव.
४. सचिव, शहरी विकास मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.
५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (नवि-१) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र मेट्रो रेल्वे कॉर्पोरेशन लि, नागपूर.
९. महालेखापाल- (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१०. निवासी अधिदान व लेखा अधिकारी, (लेखा परीक्षा), मुंबई.
११. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई ३२ .
१२. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१३. वित्त विभाग कार्यासन- व्यय-३, अर्थसंकल्प-१६, अर्थसंकल्प-३, मंत्रालय, मुंबई.
१४. नियोजन विभाग (कार्यासन १४४४), मंत्रालय, मुंबई.
१५. सह सचिव नवि-५, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. कक्ष अधिकारी नवि-४/नवि-३१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ .
१७. रोख शाखा (नवि) (३ प्रती), मंत्रालय, मुंबई.
१८. निवड नस्ती, नवि-७.

**शासन निर्णय क्रमांक: एमआरडी-३३२४/प्र.क्र.८५/नवि-७ दि.१९ मार्च, २०२५ चे सहपत्र**

**जोडपत्र-अ**

**महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. यांना नागपूर मेट्रो रेल्वे टप्पा-२ करीता सन २०२४-२५ मध्ये रु.६४.६६९९ कोटीचे दुय्यम कर्ज सहाय्य वितरीत करण्याबाबत.**

| अ.क्र. | विवरण | माहिती |
|---|---|---|
| १. | संस्थेचे नांव | महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि., नागपूर (केंद्र व राज्य शासनाचे संयुक्त एसपीव्ही) मेट्रो हाऊस, २८/२, सी.के.मार्ग, आनंद मार्ग, सिव्हिल लाईन्स, नागपूर-४४० ००१. |
| २. | वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक व दिनांक | वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१२ फेब्रुवारी, २०२५ |
| ३. | कर्जाची एकूण मंजूर रक्कम | रु.२१२ कोटी |
| ४. | मंजूर कर्जापैकी यापूर्वी कर्जाची रक्कम वितरीत करण्यात आली असल्यास वितरीत करण्यात आलेली कर्जाची रक्कम | सन २०२३-२४ :- रु.१०० कोटी<br>सन २०२४-२५ : रू.३२.३३०१ कोटी<br>(या निधी वितरण आदेशापूर्वी) |
| ५. | मंजूर कर्जापैकी सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेली कर्जाची रक्कम | **रु.६४.६६९९ कोटी** |
| ६. | एकापेक्षा अनेक सहकारी संस्था, व्यक्ती/यांना कर्ज मंजूर करण्यात आले असल्यास त्यांच्या नावासमोर, कर्ज मंजूरी रक्कम नमूद करण्यात यावी | लागू नाही. |
| ७. | एकूण कर्ज परतफेडीचे हप्ते | एका हप्त्यात |
| ८. | कर्ज परतफेडीचे हप्त्याची रक्कम | **रु.६४.६६९९ कोटी** |
| ९. | कर्ज परतफेडीचे हप्त्याच्या कालावधी, जसे वार्षिक/सहामाही/त्रैमासिक इत्यादी | मुख्य कर्जाच्या अनुषंगाने अटी व शर्ती निश्चित झाल्यानंतर सदर प्रकल्पासाठी घेण्यात येणाऱ्या मुख्य कर्जाची परतफेड ज्यासाली पुर्ण होईल त्यानंतरच्या पहिल्या वर्षात दुय्यम कर्ज सहाय्याची परतफेड एका हप्त्यात वसूली होणे अपेक्षित आहे. |
| १०. | कर्ज परतफेडीसाठी सवलतीचा कालावधी (Moratorium Period) | नाही. |
| ११. | कर्ज परतफेडीसाठी हप्त्याच्या निश्चित केलेला कर्ज हप्त्याचा दिनांक | - |

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2025.03.19 12:44:19 +05'30'

**[विजय चौधरी]**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

| | | |
|---|---|---|
| १२. | कर्ज परतफेडीच्या पहिल्या हप्त्याचा दिनांक | मुख्य कर्जाच्या अनुषंगाने अटी व शर्ती निश्चित झाल्यानंतर सदर प्रकल्पासाठी घेण्यात येणाऱ्या मुख्य कर्जाची परतफेड ज्यासाली पुर्ण होईल त्यानंतरच्या पहिल्या वर्षात दुय्यम कर्ज सहाय्याची परतफेड एका हप्त्यात. |
| १३. | कर्ज परतफेडीच्या शेवटच्या हप्त्याचा दिनांक | |
| १४. | व्याज दर | सदर कर्जावर व्याज आकारणी बाबत तुर्तास तरतूद नाही. तथापि, भविष्यात व्याज आकारण्याची वेळ आल्यास वित्त विभागाच्या सहमतीने व्याज वसूली व व्याजाचा दर निश्चित करण्यात येईल. |
| १५. | विलंब कालावधीसाठी दंडनीय व्याजदर व इतर आकार | लागू नाही. |
| १६. | व्याजाचा परतफेडीच्या हप्त्याचा कालावधी जसे वार्षिक/त्रैमासिक/सहामाही इत्यादी | अनुक्रमांक १४ प्रमाणे |
| १७. | कर्जाच्या खर्चाकरीता लेखाशिर्ष | "मागणी क्र. एफ-७ ६२१७- नगर विकासासाठी कर्जे, ८०, सर्वसाधारण १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे राज्य योजना, (००) (०२) नागपूर मेट्रो रेल्वे प्रकल्पाकरिता राज्य शासनाचे दुय्यम कर्ज ५५ - कर्जे व आगाऊ रक्कमा सांकेतांक क्रमांक (६२१७०७८८) |
| १८. | कर्जाच्या वसूलीचे लेखाशिर्ष | नवीन लेखाशिर्ष घेण्यात येत आहे. |
| १९. | कर्जावरील व्याज/दंडनिय व्याज वसूलीचे लेखाशिर्ष | अनुक्रमांक १४ प्रमाणे |
| २०. | कर्जाशी संबंधित असलेल्या सहकारी संस्था यांचे पदनाम, पत्ता व दूरध्वनी क्रमांक | लागू नाही. |
| २१. | शासकिय कंपनीच्या नोडल ऑफीसचे पदनाम, पत्ता व दूरध्वनी क्रमांक | संचालक (वित्त), महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि., मेट्रो हाऊस, २८/२, सी.के.मार्ग, आनंद मार्ग, सिव्हिल लाईन्स, नागपूर-४४० ००१.<br>फोन नं. ०७१२-२५५४२१७<br>Email nmrcl.cafo@gmail.com |
| २२. | डी. डी.ओ.चा नंबर | कक्ष अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.<br>डी. डी.ओ. नंबर- ७१०१००२३०१. |

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB58BF87424118BCCD6EE07340581733B70, cn=VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2025.03.19 12:44:50 +05'30'

**[विजय चौधरी]**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**